**तबलजी आणि स्वतंत्र उच्च माध्यमिक शाळेतील/ कनिष्ठ महाविद्यालयातील मुख्याध्यापक यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वेतन-१२१९/प्र.क्र.१९/टीएनटी-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ४ मे, २०२३

<u>संदर्भ</u> :-

१. शासन निर्णय वित्त विभाग क्र.वेपुर-२०१८/प्र.क्र.४४/सेवा-९, दिनांक ०१ जानेवारी, २०१९
२. शासन अधिसूचना वित्त विभाग क्र.वेपुर २०१९/प्र.क्र.१/सेवा-९, दिनांक ३० जानेवारी, २०१९
३. शासन परिपत्रक वित्त विभाग वेपुर २०१२/प्र.क्र.८/सेवा-९, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९
४. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.वेतन १२१९/प्र.क्र.१९/टीएनटी-३, दि.२२.०२.२०१९
५. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.वेतन १२१९/प्र.क्र.१०५/टीएनटी-३, दि.१०.०१.२०२०
६. शासन निर्णय वित्त विभाग क्र.वेपुर-११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दिनांक १३ फेब्रुवारी, २०२३.

**<u>प्रस्तावना</u>-**

सातव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशीवरील केंद्र शासनाचे निर्णय विचारात घेऊन राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्याकरीता श्री.के.पी.बक्षी, सेवानिवृत्त अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ ची स्थापना करण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशी शासनाने काही फेरफारासह स्वीकृत करण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील या विभागाच्या अखत्यारीत येणाऱ्या अनुदानित खाजगी प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक शाळा, कनिष्ठ महाविद्यालये, अध्यापक विद्यालये व सैनिकी शाळांतील पूर्णवेळ शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना संदर्भ क्र.२ मध्ये नमूद शासन अधिसूचनामधील तरतुदीनुसार सुधारीत वेतन संरचना लागू करण्यात आलेली आहे. राज्य वेतन सुधारणा समितीने आपला खंड-२ अहवाल सुधारणेसह वित्त विभागास सादर केला आहे. सदर अहवालातील शिफारशी वित्त विभागाने शासन निर्णय दि.१३.०२.२०२३ अन्वये स्विकृत केलेल्या आहेत. त्यानुषंगाने या विभागाच्या अखत्यारीत कार्यरत तबलजी व स्वतंत्र उच्च माध्यमिक शाळांतील/ कनिष्ठ महाविद्यालयातील मुख्याध्यापक यांचे वेतनस्तरामध्ये सुधारणा करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>-**

या विभागांर्तगत राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित शाळांतील तबलजी व स्वतंत्र उच्च माध्यमिक शाळेतील/ कनिष्ठ महाविद्यालयातील “मुख्याध्यापक” यांच्या वेतनस्तरामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करणेस मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वित्त विभाग, शासन अधिसूचना दि.३०.०१.२०१९ मधील शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत नमूद अनुक्रमांक | शासन निर्णय दि.२२.०२.२०१९ मधील पदनाम क्रमांक | पदनाम | शासन निर्णय दि.२२.०२.२०१९ अन्वये मंजूर वेतनस्तर | सुधारीत वेतनस्तर |
|---|---|---|---|---|---|
| १ | ३३० | ४२ | तबलजी/ Tabalji | S-६ : १९९००-६३२०० | S-८ : २५५००-८११०० |
| २ | ३५९ | ७१ | मुख्याध्यापक, स्वतंत्र उच्च माध्यमिक शाळेतील/ कनिष्ठ महाविद्यालयातील (दुसऱ्या वर्गातील पदव्युत्तर पदवीधर अधिक बी.एड.) Head Master of Independent Higher Secondary School or Jr. College) (Post Graduate in Second Class + B.Ed.) | S-१६ : ४४९००-१४२४०० | S-१७ : ४७६००-१५११०० |

२. उक्त नमूद तबलजी या पदास सुधारीत वेतनस्तर S-८ : रू. २५५००-८११०० दि.०१.०१.२०१६ पासून काल्पनिकरित्या मंजूर करण्यात येत असून प्रत्यक्ष आर्थिक लाभ दि.०१.०२.२०२३ पासून अनुज्ञेय राहील. तसेच सुधारीत वेतनस्तर लागू केल्याने दि.०१.०१.२०१६ ते दि.३१.०१.२०२३ या कालावधीतील कोणतीही थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

३. मुख्याध्यापक, स्वतंत्र उच्च माध्यमिक शाळेतील/ कनिष्ठ महाविद्यालयातील (दुसऱ्या वर्गातील पदव्युत्तर पदवीधर अधिक बी.एड.) या संवर्गास शासन निर्णय दि.१३.०२.२०२३ मधील जोडपत्र क्र.२ नुसार सुधारीत वेतनस्तर S-१७: रू.४७६००-१५११०० दि.०१.०१.२०१६ पासून अनुज्ञेय राहील. दि.०१.०१.२०१६ ते दि.३१.१२.२०१८ या कालावधीमधील वेतनाची थकबाकी संदर्भ क्र.५ वर नमूद शासन निर्णय दि.१०.०१.२०२० मधील तरतुदीनुसार अदा करण्यात यावी. तसेच दि.०१.०१.२०१९ ते दि.३०.०४.२०२३ या कालावधीमधील वेतनातील फरक रोखीने अदा करण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११६/२०२३/सेवा-९, दिनांक २७.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०५०४१४५६३३९०२१ हा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.05.04 15:02:21 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक)
१०. शिक्षण निरीक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम), मुंबई
११. सर्व अधीक्षक, वेतन पथक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक)
१२. अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती (टीएनटी-३)